GR200505131637190001-0100

**भटक्या जमातीमध्ये नव्याने समाविष्ट केलेल्या जातींना सवलती देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २००३/१३४१/प्र.क्र.६३/०३/१६ ब
मंत्रालय मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ७ मे, २००५,

**पहा** :- १) शासन निर्णय , सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-१०९३/११६७/ प्र.क्र.१४१/९३/१६ ब, दिनांक २३ मार्च १९९४

**प्रस्तावना : -** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:बीसीसी -१०९३/११६७/ प्र.क्र.१४१/९३/१६ब , दिनांक २३ मार्च १९९४ अन्वये इतर मागासवर्गीयांना तसेच विमुक्त जाती व भटक्या जमातींना शासकीय व निमशासकीय सेवेत सुधारीत आरक्षण विहीत करण्यात आले. या शासन निर्णयानुसार विमुक्त जाती व भटक्या जमातीकरीता खालील प्रमाणे सुधारीत आरक्षण विहीत करण्यात आले आहे.

| | |
|---|---|
| (अ ) विमुक्त जाती ( १४ व तत्सम जाती ) | ३ % |
| (ब) भटक्या जमाती ( जानेवारी १९९० पूर्वीच्या २८ व तत्सम जाती ) | २.५ % |
| (क) भटक्या जमाती ( धनगर व तत्सम जमाती ) | ३.५ % |
| (ड) भटक्या जमाती ( वंजारी व तत्सम जमाती ) | २ % |
| एकुण | ११ % |

वरील शासन निर्णयाप्रमाणे विमुक्त जातीमधील १४ जातींना तर भटक्या जमातीमधील एकुण ३० जातींना आरक्षणाचे फायदे दिलेले आहेत. आता विमुक्त जाती व भटक्या जमाती , इतर मागास वर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या क्रमांक - सीबीसी १०९८/प्र.क्र. १८५/इमाव-५, दिनांक १४ फेब्रुवारी २००१ च्या शासन निर्णयान्वये खालील जातींचा भटक्या जमातीमध्ये नव्याने समावेश करण्यात आला.

३१-- मरीआईवाले, कडकलक्ष्मीवाले, मरगम्मावाले
३२-- गिहरा / गहरा
३३-- गुसाई /गोसाई

३४-- मुस्लिम मदारी, गारुडी, सापवाले व जादुगर
३५-- भारतीय इराणी

याशिवाय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय विभागाच्या क्रमांक -सीबीस -१०/२००१/प्र.क्र.२३२ /मावक -५, दिनांक १ जून २००४ च्या शासन निर्णयान्वये खालील जातींचा भटक्या जमातीमध्ये नव्याने समावेश करण्यात आला.

३६ -- गवळी , मुस्लिम गवळी

३७ -- दरवेशी , वाघवाले, शाह ( मुस्लिम धर्मीय) , अस्वलवाले

भटक्या जमातीमध्ये नव्याने समाविष्ट केलेल्या वरील जातींना विमुक्त जाती / भटक्या जमातीमधील कोणत्या उप गटांचे फायदे दयावेत याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** भटक्या जमातीमध्ये नव्याने समावेश केलेल्या खालील जातींना आरक्षण व अन्य सवलती करीता भटक्या जमाती (ब) या उपगटाचे फायदे देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३१-- मरीआईवाले, कडकलक्ष्मीवाले, मरगम्मवाले

३२-- गिहरा / गहरा

३३-- गुसाई /गोसाई

३४-- मुस्लिम मदारी, गारुडी, सापवाले व जादुगर

३५-- भारतीय इराणी

३६ -- गवळी , मुस्लिम गवळी

३७ -- दरवेशी , वाघवाले, शाह ( मुस्लिम धर्मीय) , अस्वलवाले

२. हे आदेश शासकीय / निमशासकीय सेवा , मंडळे / महामंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषदा, अनुदानित शैक्षणिक संस्था , सहकारी संस्था, शासनाचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम इत्यादीं सर्व कार्यालयांना लागू राहतील.

३.    हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र.ग.पवार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव /अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय , मूळ शाखा , मुंबई,
* प्रबंधक , उच्च न्यायालय , अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक , लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय,
* सचिव , महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* आयुक्त, अनुसूचित जाती जमाती , भारत सरकार , पाचवा माळा, लोकनायक भवन , नवी दिल्ली
* उप संचालक, अनुसूचित जाती जमाती आयोग , भारत सरकार , चिपळूणकर भवन, शास्त्री मार्ग, नवी पेठ, पुणे , ४११ ०३०.
* विशेष आयुक्त, महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र सदन , कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली ११०००१
संचालक, समाज कल्याण, पुणे
आयुक्त, आदिवासी विकास , नाशिक
आयुक्त , आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
संचालक,रोजगार व स्वयंरोजगार विभाग , मुंबई ,
सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष ) सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती,

* पत्राने